"औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जिल्हा यवतमाळ" या संस्थेला "स्व. रुपचंद दुलीचंद सावला" यांचे नांव देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२२११/२०१६/प्र.क्र. ०३/व्यशि-२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०१६.

वाचावे :- (१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : आयटीआय-१०००/(१२३) व्यशि-१, दिनांक ४ मे, २००१.
(२) शासन पत्र, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : व्हीआयपी-१००६/(२७७/०६)/व्यशि-२, दिनांक २८ सप्टेंबर, २००६.
(३) रिट याचिका क्रमांक : ९०९/२०१६, सौ. अलका धरमचंद सावला, अमरावती विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर.
(४) मा. मुंबई उच्च न्यायालयाचे नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे रिट याचिका क्रमांक : ९०९/२०१६ वरील सुनावणीच्या वेळी दिनांक ०२ मे, २०१६ रोजी दिलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये, "औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जि. यवतमाळ" या संस्थेला "रुपचंद दुलीचंद सावला" यांचे नांव देण्यात येईल, या अटीच्या अधीन राहून सौ. अलका धरमचंदजी सावला, यांची नेर येथील शेत सर्वे क्रमांक : १५४, गट क्रमांक २८० मधील १.२२ हेक्टर इतकी जमीन ताब्यात घेण्यात आली होती. तथापि, शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक (२) च्या पत्रान्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी खाजगी जमीन दानरुपाने शासनाच्या ताब्यात घेण्यात आल्यास, अशा व्यक्तींचे संस्थेस नांव न देता संस्थेच्या इमारतीच्या बांधकामानंतर संगमरवर कोनशिलेवर दानकर्त्याचा नावाचा उल्लेख राहील असा निर्णय घेण्यात आला होता. यास्तव, सौ. अलका धरमचंदजी सावला यांनी, उक्त संस्थेला "रुपचंद दुलीचंद सावला" याचे नांव देण्यात आले नसल्याने संदर्भाधीन क्रमांक (३) अन्वये मा. नागपूर खंडपीठ येथे रिट याचिका क्रमांक : ९०९/२०१६ दाखल केली होती. सदर रिट याचिकेवर मा. नागपूर खंडपीठाने संदर्भाधीन क्रमाक (४) अन्वये शासनाच्या दिनांक ४ मे, २००१ च्या निर्णयान्वये संस्थेस "रुपचंद दुलीचंद सावला" यांचे नांव देण्याच्या अटीवर विषयाधीन जागा ताब्यात घेतली असल्याने, यथास्थिती तद्नंतर दिनांक २८ सप्टेंबर, २००६ च्या पत्रान्वये खाजगी जमीन दान रुपाने संस्थेकरीता शासनाच्या ताब्यात घेतल्यास दानकर्त्याच्या नांवाचा उल्लेख संस्थेच्या संगमरवर कोनशिलावर राहील असा निर्णय घेण्यात आला असल्याने, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जि. यवतमाळ" या संस्थेला "रुपचंद दुलीचंद सावला"

यांचे नांव देण्याचे आदेशित केले आहे. मा. नागपूर खंडपीठाच्या आदेशानुसार कार्यवाही करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मा. मुंबई उच्च न्यायालयाचे नागपूर खंडपीठ, नागपूर यांनी रिट याचिका क्रमांक : ९०९/२०१६ मध्ये दिनांक ०२ मे, २०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार "औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जि. यवतमाळ" या संस्थेला "स्व. रुपचंद दुलीचंद सावला," असे नांव देण्याबाबत खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

(१) सौ. अलका धरमचंदजी सावला, यांनी "औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जिल्हा यवतमाळ" या संस्थेकरीता दान केलेल्या जमीनीवर यापुढे त्यांचा, यथास्थिती त्यांच्या रक्ताच्या नात्यातील कुटूंबिय अथवा नातलग यांचा कोणताही हक्क राहणार नाही.

(२) संस्थांसाठी खाजगी जमीन दानकर्त्याने दिल्यास पूर्वोदाहरण म्हणून त्यांचे अथवा त्यांच्या कुटूंबियांचे यथास्थिती नातलगाचे नांव संस्थेला देता येणार नाही. संस्थेच्या बांधकामानंतर इमारतीच्या संगमरवर कोनशिलेवर केवळ दानकर्त्याचा नावाचा उल्लेख राहण्याबाबत शासनाच्या दिनांक २८ सप्टेंबर, २००६ च्या पत्रान्वये घेतलेला निर्णय यापुढेही कायम राहील.

(३) "औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जि. यवतमाळ" या संस्थेस "स्व. रुपचंद दुलीचंद सावला" यांचे केवळ नांव देण्यात येईल. तसेच, त्यांच्या कुटूंबियांकडून संस्थेच्या अंतर्गत व्यवहारामध्ये यथास्थिती काराभारामध्ये कोणताही हस्तक्षेप करण्यात येणार नसल्याचा लेखी करारनामा संस्थेमार्फत सौ. अलका धरमचंद सावला व त्याच्या कूटूंबियांकडून करुन घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११७१०५७३७८४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SD And E Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6d1f4d2e41b8e84bb98ddddcac3054927f82f9c1a5810e2874cdac2c44c28c2, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2016.11.17 12:17:31 +05'30'

**(स. दि. खरात)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई,
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मोर्शी रोड, अमरावती.
३) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेर, जि. यवतमाळ
४) शासकीय अभियोक्ता, मा. मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर.
५) श्रीमती अलका धरमचंद सावला, सागर अपार्टमेंट, कॅम्प, अमरावती, ता. व जि. अमरावती.
६) निवड नस्ती, व्यशि- २ कार्यासन, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रतिलिपी, माहितीस्तव सादर.**

मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
मा. सभापती, विधानपरिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.